**“कालवा स्वच्छता अभियान” अशासकीय संस्था/ सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपन्या इत्यादी मार्फत <u>राबविण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-- संकिर्ण/०९१८/(प्र.क्र. ९६/१८)/यांत्रिकी**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०१८.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्यात जलसंपदा विभागांतर्गत जून २०१६ अखेर ४९.५७ लक्ष हेक्टर सिंचन क्षमता निर्माण झाली असून एकूण ८२ मोठे, २३७ मध्यम व ३२९९ लघु पाटबंधारे प्रकल्प आहेत. या प्रकल्पातून पाणी उपलब्धतेनुसार सरासरी ४० लक्ष हेक्टर प्रत्यक्ष सिंचन होत आहे. सिंचन पाणी पाळी दरम्यान कालव्यात मोठया प्रमाणात गाळ येतो, तसेच पावसाळा कालावधीत कालव्यात गाळ येणे, कालवा फुटणे, कालव्यात गवत, झाडे झुडपे इ. वाढ यामुळे कालव्याची वहन क्षमता मोठया प्रमाणवर कमी होते. प्रत्येक प्रकल्पाच्या कालव्याचे जाळे विस्तीर्ण व विखुरलेले असल्याने सर्व ठिकाणी एकाच वेळेस गाळ काढण्याची कामे करणे जिकीरीचे होत आहे.

राज्याने शा.नि. गामुध-२०१७/प्र.क्र. १३४/जल-१, दिनांक ६ मे २०१७ रोजीच्या निर्णयाद्वारे गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना जाहीर केली व आता ती यशस्वीपणे राबविल्या जात आहे. त्याच धर्तीवर कालवा स्वच्छता अभियान ही योजना राबविण्याचे नियोजन आहे. दरवर्षी साधारणपणे १५ सप्टेंबर ते ३१ डिसेंबर पर्यंत कालव्यातील गाळ काढण्याच्या कामाचा कालावधी आहे. तसेच यानंतर धरणाच्या जलाशयातील गाळ काढण्याच्या कामाचा कालावधी जानेवारी ते जून पर्यंत असा आहे. त्यामुळे कालवा स्वच्छता अभियान योजना राबविल्यास उपलब्ध असलेल्या यंत्रसामुग्रीचा वर्षभर पूर्ण कार्यक्षमतेने वापर होईल.

कॉर्पोरेट सामाजिक जबाबदारी (CSR) मध्ये कॉर्पोरेट क्षेत्राने प्रकल्पांचे लाभधारक शेतकरी यांच्या आर्थिक व सामाजिक विकासासाठी केलेल्या प्रयत्नांचा आणि बांधिलकीचा समावेश होतो. यासाठी कालवा स्वच्छता अभियान योजनेच्या माध्यमातून कॉर्पोरेट संस्था शासनाच्या प्रयत्नामध्ये सक्रिय भागीदार होऊ शकतात.

वरीलप्रमाणे कालव्यातून संपूर्ण गाळ व झाडे झुडपे काढल्यास कालव्याच्या वहनक्षमतेत वाढ होईल, कालव्याचे पाणी अंतीम (Tail End) भागात पोहचेल, सर्व लाभधारकांना पाणी मिळेल व त्यांच्या उत्पन्नात वाढ होईल. या कामी अशासकीय संस्था / सहकारी संस्था / कॉर्पोरेट क्षेत्राचा सहभाग घेऊन -गाळमुक्त कालवे ही योजना राबविणे शासनाच्या विचाराधीन होते. यास्तव शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णयः-

१.० शा.नि. क्र. देवदू २०१५/(८३६/२०१५)/सिं व्य (कामे) दिनांक १७ नोव्हेंबर २०१६ नुसार राज्यातील सिंचन व्यवस्थापन महामंडळाकडे वर्ग करण्यात आले आहे. तसेच पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनासाठी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. तथापि, महाराष्ट्रातील सुमारे ३६१९ प्रकल्पांच्या धरण व कालव्याच्या देखभाल व दुरुस्तीची मोठी जबाबदारी पाटबंधारे विकास महामंडळावर आहे. यात प्रामुख्याने दरवर्षी कालवे व वितरण व्यवस्थेची झाडे झुडपे काढणे, कालवे भराव कामे करणे व गाळ काढण्याची कामे मोठया प्रमाणावर करावी लागतात. या कामी जलसंपदा विभागातील यांत्रिकी विभाग, पाणी वापर संस्था यांचे समवेत अशासकीय संस्था / सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपन्या इत्यादी संस्थांचा सक्रीय सहभाग पुढील मार्गदर्शक तत्वानुसार घेण्यात यावा.

२.० कालवा स्वच्छता अभियान योजनेची अंमलबजावणी खालीलप्रमाणे करण्यात यावी :-

अ) अशासकीय संस्था / सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपनी यांनी १००% स्वखर्चाने अथवा CSR च्या माध्यमातून उपलब्ध होणाऱ्या निधीमधून संपूर्ण कालवा स्वच्छता कामे करणे.

आ) कालवा स्वच्छता अभियानासाठी अशासकीय संस्था / सहकारी संस्थांना इंधन व यंत्रचालकाचा खर्च देणे.

३.० राज्यातील कॉर्पोरेट क्षेत्र, स्वयंसेवी संस्था, शासन यांचे मधील समन्वयासाठी राज्यस्तरावर व जिल्हास्तरावर CSR निधीतून कालवा स्वच्छता अभियानासाठी संनियंत्रण समित्या गठीत करण्यात येत आहेत. त्याची रचना खालीलप्रमाणे असेल :-

### (अ) राज्यस्तरीय समिती

| | | |
|---|---|---|
| (१) | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| (२) | कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| (३) | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | सदस्य |
| (४) | कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | सदस्य |
| (५) | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | सदस्य |
| (६) | कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | सदस्य |
| (७) | प्रतिनिधी- अशासकीय / स्वयंसेवी संस्था-२ | सदस्य |
| (८) | प्रतिनिधी- कॉर्पोरेट क्षेत्रातील-२ | सदस्य |
| (९) | अ.अ. व उप सचिव (लाक्षेवि) | सदस्य सचिव |

### ब) जिल्हास्तरीय समिती

| | | |
|---|---|---|
| (१) | अधीक्षक अभियंता (सिंचन व्यवस्थापन) | अध्यक्ष |
| (२) | कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) | सदस्य |
| (३) | प्रतिनिधी- अशासकीय / स्वयंसेवी संस्था-१ | सदस्य |
| (४) | प्रतिनिधी- कॉर्पोरेट क्षेत्र-१ | सदस्य |
| (५) | पाणी वापर संस्था प्रतिनिधी-१ | सदस्य |
| (६) | कार्यकारी अभियंता (सिंचन व्यवस्थापन) | सदस्य सचिव |

**<u>राज्यस्तर समितीची कार्यकक्षा</u> :-**

१) मोठे / मध्यम / लघु / उपसा सिंचन योजना कालव्यांच्या स्वच्छतेची कामे हाती घेण्यासाठी महामंडळ / जिल्हास्तर समिती व अशासकीय संस्थांमध्ये समन्वय साधणे व संनियंत्रण करणे.

२) कालवा स्वच्छता अभियानाचा जिल्हास्तर समितीकडून त्रैमासिक आढावा घेणे.

**<u>जिल्हास्तर समितीची कार्यकक्षा</u> :-**

१) जिल्हास्तर समितीमार्फत इच्छूक कॉर्पोरेट संस्था, स्वयंसेवी संस्था यांचेशी संपर्क करणे, त्यांचे समवेत बैठक घेऊन कामाचे स्वरुप, कामाचे स्थळ, इ. बाबतची माहिती देणे.

२) जिल्हास्तरावरील समितीकडून त्यांचेशी संबंधित प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीची तपशिलवार माहिती संबंधित महामंडळाच्या व जलसंपदा विभागाच्या संकेतस्थळावर प्रकाशित करणे.

३) मंजूर पाखरण कार्यक्रमात समावेश असलेली कालवा स्वच्छता कामे प्राधान्याने हाती घेण्यात यावीत. पाखरण कार्यक्रमात समावेश नसल्यास प्रकल्पाशी संबंधित कार्यकारी अभियंता हे या कालवा स्वच्छता अभियानांतर्गत प्रस्तावित कामांचा पाखरण कार्यक्रमात समावेश करतील. अशा पध्दतीने मंजूर पाखरण कार्यक्रमात समावेश झालेल्या सर्व कालवा स्वच्छता कामांचा तपशिल जिल्हास्तरावरील समितीने प्राप्त करून घेऊन त्यातील कामे कॉर्पोरेट संस्था / अशासकीय संस्था / सहकारी संस्था यांच्या मदतीने हाती घेण्याबाबत कार्यवाही करावी.

४.० **<u>सर्वसाधारण सूचना :-</u>**

१) या उपक्रमात अशासकीय संस्था/ पाणी वापर संस्था हया शासन व कॉर्पोरेट क्षेत्र यातील दुवा म्हणून काम करतील.

२) ज्या अशासकीय संस्था / सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपनी १००% स्वखर्चाने अथवा CSR च्या माध्यमातून कालवा स्वच्छता कामे करत असतील, त्यांना कार्यक्षेत्र उपलब्ध करुन द्यावे. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाच्या किंमतीबाबत आवश्यक प्रमाणपत्र (सोबतचे प्रपत्र-१) संबंधीत कंपनीला द्यावे.

३) कालवा स्वच्छता अभियानांतर्गत कामासाठी अशासकीय संस्था/ सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपन्या इत्यादींना इंधन व यंत्र चालकाच्या देय दराबाबत तक्ता खालीलप्रमाणे :-

| **कालवा स्वच्छता कामाकरिता लोक सहभागातून वापरण्यात येणाऱ्या संयंत्राचा सरासरी सामाईक दर** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामाचा प्रकार** | **प्रती घन मीटर डिझेलचा दर (₹/Cum)** | **प्रती घन मीटर डिझेल व यंत्रचालक यांचेसह दर (₹/Cum)** | **गवत व झाडे-झुडपे काढणे याचा प्रती चौ.मि. डिझेलचा दर (₹/Sqm)** | **गवत व झाडे-झुडपे काढणे याचा प्रती चौ.मि. डिझेल व यंत्रचालक यांचेसह दर (₹/Sqm)** |
| १ | माती/गाळ, गवत व झाडे-झुडपे काढणे, खोदकाम व भरणे (Excavation & loading)<br>कोणत्याही प्रकारच्या एका संयंत्राद्वारे (Excavator / Loader Backhoe) | १२.६७ | १४.६० | १.२७ | १.४६ |

टीप :- १. उपरोक्त दर हे सन २०१८-१९ पासून पुढील कालावधीकरीता लागू करण्यात येत आहेत.
२. उपरोक्त दर हे कालवा स्वच्छता या अंतर्गतच्या फक्त लोकसहभागाच्या कामाकरीता लागू राहतील.
३. उपरोक्त दरात इतर पूरक यंत्रे, टिप्पर्स, ट्रॅक्टर्स, ट्रक्स इत्यादींचा समावेश नाही.

४) कालवा स्वच्छता अभियानांतर्गत अशासकीय संस्था/ सहकारी संस्था / कॉर्पोरेट कंपन्या इत्यादींमार्फत कामे प्रस्तावित करण्यापूर्वी कालव्याची संरचना, विनिर्दिष्टे तसेच प्रस्तावित कामाचे मंजूर अंदाजपत्रक संबंधितास देणे. तसेच पूर्ण केलेल्या कामाची मोजमापे घेणे व त्यानुसार उपरोक्त मुद्दा क्र. १ येथील तक्त्यातील दरानुसार निधी अशासकीय संस्थांना देण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंत्यांची असेल. परंतु निधी अभावी अतिरिक्त दायित्व निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याप्रमाणे कामाची पुनरावृत्ती होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

५) इंधन व यंत्रचालकावर होणारा खर्च सिंचन महामंडळाकडे देखभाल व दुरुस्तीकरीता पाणीपट्टीच्या माध्यमातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

६) कॉर्पोरेट कंपनी / सहकारी संस्था / अशासकीय संस्थेस पाणी वापर संस्थेच्या कार्यक्षेत्रात ही कामे करता येतील. तथापि, ज्या ठिकाणी पाणी वापर संस्था स्थापन झालेल्या आहेत, अशा ठिकाणी यंत्रसामुग्रीच्या इंधन, वंगण व यंत्रचालकासाठी लागणाऱ्या निधीपैकी १०% निधी पाणी वापर संस्था व उर्वरित ९०% महामंडळामार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल.

७) कार्पोरेट कंपनी /अशासकीय संस्था एखादा मोठा/ मध्यम/ लघु प्रकल्प संपूर्णपणे दत्तक घेऊन त्या प्रकल्पातील संपूर्ण कालवे व वितरण व्यवस्थेची दुरुस्तीची जबाबदारी स्विकारू शकतात. अशा पध्दतीने प्रकल्पाच्या सर्व लाभधारकांना फायदा होऊन त्यांची आर्थिक व सामाजिक उन्नती होईल.

८) कालवा स्वच्छता अभियानांतर्गत कामासाठी अशासकीय संस्था/सहकारी संस्था/कॉर्पोरेट कंपन्या इत्यादींमार्फत काम करताना कालव्याच्या सुरक्षिततेस धोका पोहोचणार नाही याची दक्षता घ्यावी. ज्या ठिकाणी कालवा सुरक्षिततेस धोका पोहोचत असेल तर त्या ठिकाणी कालवा स्वच्छता कामाची कार्यवाही तात्काळ थांबविण्यात यावी.

९) कालव्यावरील कोणत्याही बांधकामास हानी पोहोचल्यास त्याची दुरुस्ती/नव्याने बांधणी संबंधितांनी त्यांचे स्वखर्चाने तातडीने करुन द्यावी.

१०) कालव्यातील काढण्यात आलेला गाळ पुन्हा कालव्यात येणार नाही. यादृष्टीने दक्षता घ्यावी.

११) कालवा स्वच्छता अभियान सुरु करण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यानंतरचे डिजिटल फोटो / व्हिडिओ याबाबतचा तपशिल मोजमापे घेताना / इंधनाचे देयक अदा करताना सादर करण्यात यावेत.

१२) कालवा स्वच्छता अभियानामुळे झालेल्या लाभाची (सिंचन क्षेत्रात वाढ, कालव्याच्या पुच्छ भागात पाणी पोहोचणे, कालवा आवर्तन कालावधीत घट, कालवा वहन क्षमतेत वाढ इत्यादी) नोंद घेण्यात यावी व सदर माहिती जिल्हास्तरीय समितीस व राज्यस्तरीय समितीस उपलब्ध करुन देण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११०२१७१६१०९४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vijendra Prabhakar Palwankar

Digitally signed by Vijendra Prabhakar Palwankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7cb5ce90d018bdc109ad48f37ca4a3b06b0347375607bff9b7cc525c4c213e75, serialNumber=1525bd95a04e2d242eaa74f8dbc215ca88aa7bfb907686a9a62b37f3a74e5eba, cn=Vijendra Prabhakar Palwankar
Date: 2018.11.03 13:14:40 +05'30'

**( वि.प्र.पालवणकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सर्व सन्माननीय विधान सभा / विधान परिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
६. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
७. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल यांचे कार्यालय (मुंबई / नागपूर), महाराष्ट्र राज्य.
११. वित्त विभाग / सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव / सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे / तापी / गोदावरी / विदर्भ / कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, महाराष्ट्र.
१४. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१५. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे / कोल्हापूर / नाशिक / नागपूर / नांदेड, जलसंपदा विभाग.
१६. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व अधिकारी / कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ.

***

# प्रपत्र-१

## जलसंपदा विभागात कालवा स्वच्छता अभियानांतर्गत केलेल्या कामाचे प्रमाणपत्र

| अ.क्र. | तपशिल | |
|---|---|---|
| १ | कॉर्पोरेट कंपनी (CSR अंतर्गत) / सहकारी संस्था / अशासकीय संस्थेचे नांव | |
| २ | जलसंपदा विभागातील प्रकल्प व कामाचे नांव | |
| ३ | कामाचा तपशिल (कालव्याचा साखळी क्रमांक व बाबवार परिमाणासह) | |
| ४ | कामाची अंदाजित किंमत | |
| ५ | अंदाजपत्रक तांत्रिक मंजूरी दिनांक | |
| ६ | केलेल्या कामाचा कालावधी (दिनांकासह) | |
| ७ | केलेल्या कामाची किंमत (₹ लक्ष) | |

कार्यकारी अभियंता
यांची स्वाक्षरी व शिक्का